**अंगणवाडी सेविका, मदतनीस व मिनी अंगणवाडी सेविका या मानधनी पदांवरील निवडीच्या तक्रारीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
महिला व बाल विकास विभाग
शासन निर्णय क्र. एबावि-२००९/प्र.क्र.११७/का-६
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ५ फेब्रुवारी, २०१०.

**वाचा :-** शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, क्र. एबावि-२००९/प्र.क्र.११७/का-६, दिनांक २५ नोव्हेंबर, २००९

**शासन निर्णय** :- वर नमूद केलेल्या शासन निर्णयानुसार अंगणवाडी कर्मचा-यांच्या निवडीसंदर्भात तक्रारीबाबत महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम,१९६१ च्या कलम २६७ (क) नुसार संबंधित विभागीय आयुक्त (महसूल) यांना Hearing घेऊन निर्णय देण्याचे स्पष्ट केले आहे. या शासन निर्णयात खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे.

"ग्रामीण व आदिवासी प्रकल्पातील" अंगणवाडी सेविका, मदतनीस व मिनी अंगणवाडी सेविका या मानधनी पदावरील निवडीसंदर्भात तक्रारी असल्यास संबंधितांना विभागीय आयुक्त (महसूल) यांच्याकडे महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम,१९६१ च्या कलम २६७ (क) नुसार तक्रार करता येईल, विभागीय आयुक्तांनी स्थायी आदेशानुसार निवड झाली आहे का? हे तपासून याची सुनावणी (Hearing) न घेता त्यास प्रशासकीय तक्रार समजून प्रशासकीय पध्दतीने योग्य तो निर्णय घ्यावा. नागरी प्रकल्पातील अंगणवाडी सेविका व मदतनीस या मानधनी पदांच्या निवडीसंदर्भातील तक्रारीबाबत आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, रायगड भवन, नवी मुंबई यांनी वरीलप्रमाणे निर्णय घ्यावा.

वाचा येथील दिनांक २५ नोव्हेंबर, २००९ चा शासन निर्णय तसेच सदरील शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात (आले) / येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही /-
(ज. कि. मगरे)
सह सचिव

प्रति,
मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. उपमुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. मंत्री / राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
प्रधान सचिव, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
सर्व मंत्रालयीन विभाग.
महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षा), महाराष्ट्र मुंबई / नागपूर
आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना,रायगड भवन,नवी मुंबई,
महासंचालक, राजमाता जिजाऊ माता-बाल आरोग्य व पोषण मिशन, औरंगाबाद
महासंचालक, महिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
सर्व विभागीय आयुक्त
आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे
ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, विधान भवन, मुंबई ३२
सर्व जिल्हाधिकारी
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी
सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रामीण / नागरी)
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परिक्षा अधिकारी मुंबई
सर्व उप मुख्य कार्यकारी अधिकारी, (बाल कल्याण),
महिला व बाल विकास विभागातील सर्व उप सचिव, अवर सचिव व कार्यासने
निवड नस्ती (कार्यासन ६)